महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळातील
अधिकारी / कर्मचाऱ्यांना पाचव्या वेतन
आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारित
वेतनश्रेणी लागू करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

शासन निर्णय क्र. लविम- २००४/(६६)/उद्योग-६
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २१ डिसेंबर, २०१०.

**वाचा :-** १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.वेपुर-१२९६/प्र.क्र.३९/सेवा-१०, दिनांक ५ डिसेंबर, १९९७.
२) शासन अधिसूचना, वित्त विभाग, क्र.वेपुर-१२९८/प्र.क्र.१३/९८/सेवा-१०, दिनांक १० डिसेंबर, १९९८
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.वेपुर-१२०१/प्र.क्र.४/२००३/सेवा-९, दिनांक ३ नोव्हेंबर, २००३
४) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.शासाऊ-१०.१०/प्र.क्र.२२/साऊ, दिनांक २१ जून, २०१०.
५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ मर्या., मुंबई यांचे अ.शा. पत्र क्र.व्यसं/मविवि/५ वा वेतन आयोग/२००६-०७/९०३१, दिनांक २२ सप्टेंबर, २००६.
६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ मर्या., मुंबई यांचे पत्र क्र.व्यसं/मविवि/२००९-१०/७३२, दिनांक १९ जानेवारी, २०१०.

**प्रस्तावना :-** महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ मर्यादित, मुंबई या महामंडळाची स्थापना सन १९६२ मध्ये कंपनी अधिनियम, १९५६ प्रमाणे झालेली असून त्यानंतर महामंडळाची सार्वजनिक लिमिटेड कंपनी म्हणून नोंदणी झालेली आहे. राज्यामध्ये लघुउद्योजकांना कच्च्या मालाचा पुरवठा करणे, लघुउद्योजकांना मालाची विक्री करण्याकरिता सहाय्य करणे, त्यांना व्यापार गोदामे सेवा देणे, हस्तकलेच्या विकासासाठी हस्तकला कारागिरांची प्रदर्शने व व्यापारी मेळावा भरवून त्यांच्या मालाला बाजारपेठ मिळवून देणे इत्यादी प्रमुख कार्ये महामंडळाकडून केली जातात. राज्यातील सार्वजनिक उपक्रमातील कर्मचा-यांना काही अटींच्या अधीन राहून पाचव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारित वेतनश्रेणी लागू करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळातील अधिकारी / कर्मचा-यांना पाचव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारित वेतनश्रेणी लागू करण्याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**निर्णय :-** महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ मर्यादित, मुंबई येथील अधिकारी / कर्मचाऱ्यांना सुकथनकर समितीच्या शिफारशींच्या मर्यादेत तसेच कंपनी कायदा व कर्मचारी यांना लागू असणारे इतर कायदे / नियम यातील तरतुदींना अनुसरुन पाचव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार

खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून खालील तक्त्यातील रकाना क्रमांक -४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे सुधारित वेतनश्रेणी लागू करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | पदनाम | विद्यमान वेतनश्रेणी (रुपये) | पाचव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारित वेतनश्रेणी (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | महाव्यवस्थापक | ३७००-१२५-४७००-१५०-५००० | १२०००-३७५-१६५०० |
| २ | उप महाव्यवस्थापक | ३०००-१००-३५००-१२५-४५०० | १००००-३२५-१५२०० |
| ३ | व्यवस्थापक | २६००-१००-३६००-१२५-४१०० | ८०००-२७५-१३५०० |
| ४ | उप व्यवस्थापक | २२००-७५-२८००-दरो-१००-४००० | ७५००-२५०-१२००० |
| ५ | सहाय्यक व्यवस्थापक | २०००-६०-२३००-दरो-७५-३२००-१००-३५०० | ६५००-२००-१०५०० |
| ६ | लघुलेखक (निवडश्रेणी) | २३७५-७५-३२००-दरो-१००-३५०० | ७४५०-२२५-११०५० |
| ७ | लघुलेखक (उच्चश्रेणी) | २०००-६०-२३००-दरो-७५-३२०० | ६५००-२००-१०५०० |
| ८ | निवडश्रेणी सहाय्यक | १६४०-६०-२६००-दरो-७५-२९०० | ५५००-१७५-९००० |
| ९ | सहाय्यक/लघुलेखक (कनिष्ठ श्रेणी) | १४००-४०-१८००-दरो-५०-२३०० | ४५००-१२५-७००० |
| १० | कनिष्ठ सहाय्यक | ९७५-२५-११५०-दरो-३०-१६६० | ४०००-१००-६००० |
| ११ | निम्नश्रेणी कनिष्ठ लिपिक/ व. वाहन चालक | ९७५-२५-११५०-दरो-३०-१६६० | ३२००-८५-४९०० |
| १२ | कनिष्ठ लिपिक/ टंकलेखक/ वाहन चालक | ९५०-२०-११५०-दरो-२५-१५०० | ३०५०-७५-३९५०-८०-४५९० |
| १३ | व.शिपाई/ व.कामगार / व.स्वच्छक / व.रखवालदार | ७७५-१२-९५५-दरो-१५-१०३०-२०-११५० | २६१०-६०-२९१०-६५-३३००-७०-४००० |
| १४ | शिपाई/कामगार/ स्वच्छक/ रखवालदार | ७५०-१२-८७०-दरो-१४-९४० | २५५०-५५-२६६०-६०-३२०० |

२. महामंडळातील अधिकारी/ कर्मचा-यांच्या विद्यमान वेतनश्रेणीमध्ये दिनांक १ जानेवारी, १९९६ पासून काल्पनिक वेतनवाढ व अनुज्ञेय लाभ ग्राहय धरुन दिनांक १ जानेवारी, १९९६ रोजी असलेला महागाई भत्ता पहिली व दुसरी अंतरिम वाढ इत्यादी बाबींचा समावेश करुन सुधारित वेतनश्रेणी निश्चित करण्यात यावी. दिनांक ३१ डिसेंबर, २००७ पर्यंतच्या काल्पनिक वार्षिक वेतनवाढी विचारात घेऊन दिनांक १ जानेवारी, २००८ पासून प्रत्यक्ष लाभ देण्यात यावेत. मात्र दिनांक १ जानेवारी, १९९६ पासून ते ३१ डिसेंबर, २००७ पर्यंतच्या वेतननिश्चिती संबंधीच्या फरकाची कोणतीही थकबाकी अनुज्ञेय राहणार नाही.

३. महामंडळातील अधिकारी / कर्मचा-यांना अनुज्ञेय ५० टक्के महागाई भत्ता मूळ वेतनात समाविष्ट करुन पाचव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारित वेतनश्रेणी दिनांक १ जानेवारी, २००८ पासून प्रत्यक्षात लागू करण्यात यावी.

४. पाचव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारित वेतनश्रेणीमध्ये वेतन निश्चिती करताना शासन निर्णय वित्त विभाग, दिनांक ५ जानेवारी, १९९९ मधील सूचनांनुसार महामंडळाने कार्यवाही करावी.

५. राज्य शासकीय कर्मचा-यांना अनुज्ञेय असलेल्या सुधारित वेतनश्रेणी महामंडळातील कर्मचाऱ्यांना लागू करण्यात येत असल्यामुळे शासकीय कर्मचा-यांच्या पदांच्या वेतन पुनर्रचनेशी महामंडळातील पदांची वेतन पुनर्रचना अवलंबून राहील. त्यामुळे तक्त्यामध्ये दर्शविलेल्या वेतनश्रेणींमध्ये संचालक मंडळास शासनाच्या पूर्वसहमतीशिवाय कोणताही बदल करता येणार नाही.

६. सुधारित वेतनश्रेणी लागू केल्यानंतर कर्मचा-यांकडून जर काही रकमा वसूल करावयाची आवश्यकता निर्माण झाल्यास महामंडळाला लागू असलेल्या कामगार कायदेविषयक बाबी लक्षात घेऊन अतिप्रदान केलेली रक्कम वसूल करावयाची किंवा कसे? याबाबत महामंडळ संचालक मंडळाच्या मान्यतेने स्वंतत्रपणे कार्यवाही करील.

७. सुधारित वेतनश्रेणी व भत्त्यावरील होणारा खर्च महामंडळाच्या उत्पन्नातून भागविण्यात यावा. याकरिता शासनाकडून कोणतेही आर्थिक सहाय्य उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक - २३३/साऊ, दिनांक ३ नोव्हेंबर, २०१० अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in येथे उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१०१२२१२१४०५४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(प्र.बा. दांडेकर)
शासनाचे उप सचिव

प्रति :- माहितीसाठी व आवश्यक त्या उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित -

(१) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
(२) उप मुख्यमंत्र्यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
(३) मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
(४) मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
(५) राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
(६) सर्व विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानसभा.
(७) सर्व विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र विधान परिषद.
(८) महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञयेता/लेखापरीक्षा) मुंबई.
(९) महालेखापाल,महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञयेता/लेखापरीक्षा) नागपूर.
(१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
(११) संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई.
(१२) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
(१३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ मर्यादित, मुंबई.
(१४) वित्त नियंत्रक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ मर्यादित, मुंबई.
(१५) वित्त विभाग(कार्यासने -साऊ/व्यय-१६/सेवा-९) मंत्रालय, मुंबई.
(१६) निवड नस्ती, उद्योग-६